**माझी वसुंधरा अभियानांतर्गत प्राप्त बक्षिस रकमेमधून हाती घ्यावयाच्या कामांसाठी स्थानिक स्वराज्य संस्थांनी सादर केलेल्या सविस्तर प्रकल्प अहवालास (DPR) प्रशासकीय मान्यता देण्यासाठी समिती गठित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग**
**शासन निर्णय, क्रमांक अभियान २०२२/ प्र.क्र.५७ /तां.क.१**
शहीद भगतसिंग चौक, मदाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०००३२
दिनांक: ८ फेब्रुवारी, २०२२

वाचा : (१) शासन निर्णय, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग क्रमांक अभियान-२०२१/ प्र.क्र.५७/ तां.क.-१, दिनांक ८ जुलै, २०२१

**प्रस्तावना:**

माझी वसुंधरा अभियान १.० मधील ४ विविध गटातील विजेत्यांचा सन्मान दिनांक ५ जून, २०२१ रोजी करण्यात आला असून, या विजेत्या स्थानिक संस्थांना रोख बक्षिस रकमांची पारितोषीके व सदर बक्षिस रकमेच्या विनियोगाची कार्यपध्दती संदर्भीय दिनांक ८ जुलै, २०२१ च्या शासन निर्णयान्वये जाहिर करण्यात आली आहे. त्यानुसार, स्थानिक संस्थांनी पारितोषीकाच्या रकमेमधून हाती घ्यावयाचा कामांच्या सविस्तर प्रकल्प अहवालास प्रशासकीय मान्यता देण्यासाठी मा. प्रधान सचिव, पर्यावरण व वातावरणीय बदल यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

प्रस्तावनेत नमूद केलेल्या बाबींचा विचार करून माझी वसुंधरा अभियानांतर्गत बक्षिस रकमेमधून हाती घ्यावयाच्या कामाच्या सविस्तर प्रकल्प अहवालास प्रशासकीय मान्यता देण्यासाठी खालील प्रमाणे समिती गठित करण्यास शासन मान्यता देत आहे:

| | | |
|---|---|---|
| १) | मा. प्रधान सचिव, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग | अध्यक्ष |
| २) | संचालक, पर्यावरण, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग | सदस्य |
| ३) | उप सचिव (तां.क.१), पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग | सदस्य |
| ४) | अभियान संचालक, माझी वसुंधरा अभियान, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग | सदस्य सचिव |

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२२०२०८१७४७३३४९०४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षंकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SANDIP S KAMBLE

Digitally signed by SANDIP S KAMBLE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=ENVIRONMENT AND CLIMATE CHANGE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5d7be2b5d92ced254370f6b4a45426167ed60f51dcb34812d7d246c9a9c8557c, pseudonym=79EA9C474F7D4F5206B9ED0C363B11911F0A3D59, serialNumber=1E6E3F448F34D1DD3C4B0B04F8D07D573564E9568C0F01BBF302B61CD08D36F2, cn=SANDIP S KAMBLE
Date: 2022.02.09 12:39:55 +05'30'

**( संदीप कांबळे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.

२. मा. मंत्री, पर्यावरण व वातावरणीय बदल यांचे खाजगी सचिव.
३. मा. राज्यमंत्री, पर्यावरण व वातावरणीय बदल यांचे खाजगी सचिव.
४. मा. अध्यक्ष, महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळ, मुंबई
५. प्रधान सचिव, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. सर्व विभागीय आयुक्त
७. सर्व जिल्हाधिकारी.
८. सदस्य सचिव, महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळ, मुंबई
९. आयुक्त, सर्व महानगरपालिका.
१०. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
११. सर्व उप मुख्य कार्यकारी अधिकारी (ग्राम पंचायत), जिल्हा परिषद
१२. सर्व महानगर पालिकेतील मुख्य अभियंता.
१३. मुख्याधिकारी, सर्व नगरपरिषदा/ नगर पंचायती.
१४. ग्राम विकास अधिकारी / ग्राम सेवक, अभियानात समाविष्ट सर्व ग्राम पंचायती
१५. निवडनस्ती